उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला यांच्या अधिपत्याखालील ग्रामिण रुग्णालय,कळंब जि.यवतमाळ येथील दंतचिकित्सा विभागातील नवनिर्मित एक अस्थाई पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१५ /प्र.क्र.२८७/आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: १९ सप्टेंबर,२०१५

वाचा -

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -संकिर्ण २०१२/प्र.क्र.१३०/आरोग्य -३, दिनांक- २५.०७.२०१२.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -पदआ २०१५/प्र.क्र.१०४/आरोग्य -३, दिनांक- २३.०३.२०१५.
३) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-५/ ग्रा.रु.कळंब/अपदे-१/सन २०१५-१६/८१०७-०८/१५, दिनांक-१२.८.२०१५.

## शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यात सार्वजनिक आरोग्य विभागाअंतर्गत कार्यरत असलेल्या दंतविभागाचे श्रेणीवर्धन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार विभागाच्या ३८६ ग्रामिण रुग्णालयांकरीता दंत शल्य चिकित्सक,गट-अ (१ पद) व दंत सहायक, गट-ड (१पद) अशी प्रत्येकी २ पदे याप्रमाणे एकूण ७७२ पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे. त्यानुसार ग्रामिण रुग्णालय,कळंब जि.यवतमाळ येथे वरीलप्रमाणे २ पदे मंजूर करण्यात आली असून या २ पदांपैकी दंत शल्य चिकित्सक,गट-अ हे १ पद भरण्यात आलेले आलेले आहे. सदर पदास अ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये दि.२६.७.२०१४ जे दि.२८.०२.२०१५ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला यांच्या अधिपत्याखालील ग्रामिण रुग्णालय, कळंब जि.यवतमाळ येथील दंत शल्य चिकित्सक,गट-अ या १ पदास दि.०१.०३.२०१५ ते दि.२९.२.२०१६ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१५-२०१६ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०६ - सार्वजनिक आरोग्य

००१ - संचालन व प्रशासन

००१ (०८) - प्राथमिक आरोग्य केंद्राचा ग्रामिण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक,पदनि-२०१५/प्र.क्र.५/१५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक- २०.०२.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९१८१५३२२३२९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prakash Indalkar

Digitally signed by Prakash Indalkar
DN: CN = Prakash Indalkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.19 13:11:17 +05'30'

**(प्रकाश इंदलकर)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, (वैद्यकीय) मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, यवतमाळ.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.

८. वैद्यकीय अधिक्षक,ग्रामिण रुग्णालय, कळंब जि.यवतमाळ
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)